**महाराष्ट्र राज्याची "Ambassador of Youth Tourism" (महाराष्ट्र पर्यटन युवा दूत) म्हणून श्रीमती नवेली देशमुख यांना सन २०२५-२६ या वित्तीय वर्षाकरीता मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**शासन निर्णय क्रमांक टिडीएस २०२३/१२/प्र.क्र.४८०/पर्यटन-३,**
**दिनांक : २४ मार्च, २०२५.**

**संदर्भ :** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : टिडी-१६०२३/४/२०२४-टि-४, दि.१५/०१/२०२४.
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन पत्र क्रमांक : टिडीएस २०२३/१२/प्र.क्र.४८०/ पर्यटन-३, दि.२८/०८/२०२४.
३) संचालक, पर्यटन संचालनालय यांचे पत्र क्र.प.सं./प्रवजसं/म.प.युवा दूत/४८६/ २०२५/ ७४२, दि.११/०३/२०२५.
४) संचालक, पर्यटन संचालनालय यांचे पत्र क्र.प.सं./प्रवजसं/म.प.युवा दूत/४८६/ २०२५/ ८५२, दि.२०/०३/२०२५.

**प्रस्तावना :-**

पर्यटनाकरीता देशातील बहुतांश राज्यात पर्यटनाची व्यापक प्रसिध्दी करण्यासाठी विविध उपक्रम राबवून पर्यटकांना आकर्षित करण्यात येते. याकरीता अनेक क्षेत्रातील नामांकीत व्यक्तींना सहभागी करुन पर्यटन क्षेत्रातील विविध स्थळांची प्रसिध्दी करण्यात येते. राज्यातील नैसर्गिक विविधतेने नटलेल्या पर्यटनक्षेत्रांची प्रसिध्दी करुन, अधिकाधिक पर्यटकांना आकर्षित करण्यासाठी, महाराष्ट्र राज्याची "Ambassador of Youth Tourism" म्हणून श्रीमती नवेली देशमुख यांची संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये नियुक्ती करण्यात आली होती. तसेच, संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये श्रीमती नवेली देशमुख यांना सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता प्रतीमहा रुपये ६०,०००/- इतकी रक्कम उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात आली. तद्नंतर पर्यटन संचालनालयाने संदर्भ क्र.३ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार श्रीमती नवेली देशमुख यांना सन २०२५-२६ या वित्तीय वर्षाकरीता महाराष्ट्र पर्यटन युवा दूत म्हणून मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पर्यटन संचालनालयाने संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार श्रीमती नवेली देशमूख यांना "Ambassador of Youth Tourism" (महाराष्ट्र पर्यटन युवा दूत) म्हणून दि. ०१ एप्रिल, २०२५ ते दि.३१ मार्च, २०२६ या एका वर्षाच्या कालावधीसाठी मुदतवाढ देऊन प्रतिमहा रु.६०,०००/- (सर्वसमावेशक) इतकी रक्कम उपलब्ध करुन देण्यास खालील कार्य व कर्तव्याच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

❖ **कार्य व कर्तव्य :-**

१) युवा पर्यटन दूत म्हणून महाराष्ट्रातील पर्यटन स्थळांची विविध व्यासपीठावरुन प्रसिध्दी करणे.

२) युट्युब, ब्लॉग, व्हिडीओ, रिल्स, फेसबुक, इंस्टाग्राम इ. च्या माध्यमातून राज्यातील पर्यटन स्थळांची प्रसिध्दी करणे.

३) शालेय व महाविद्यालय विद्यार्थ्यांसाठी पर्यटन क्षेत्रातील संधीबाबत जागरुकता निर्माण करणे.

४) पर्यटन क्षेत्रात करिअर करु इच्छिणाऱ्या तरुणांसाठी मार्गदर्शन करणे.

५) विविध राज्यस्तरीय व राष्ट्रीय संमेलनात महाराष्ट्र पर्यटन दूत म्हणून प्रतिनिधीत्व करणे.

६) पर्यटन विभागामार्फत ओयाजित महोत्सव व कार्यक्रमात सहभागी होऊन महाराष्ट्र पर्यटनाची प्रसिध्दी करणे.

७) केंद्रीय पर्यटन मंत्रालयाद्वारे आयोजित संमेलनामध्ये सहभागी होऊन महाराष्ट्र पर्यटनाचा प्रचार व प्रसिध्दी करणे.

**०२.** सदर प्रयोजनासाठी येणारा खर्च मागणी क्र.झेडडी-४ (०२) (०४) प्रसिध्दी (कार्यक्रम) ३४५२ १९३१, ५०-इतर खर्च या लेखाशिर्षांतर्गत सन २०२५-२६ या वित्तीय वर्षासाठी प्राप्त होणाऱ्या निधीतुन भागविण्यात यावा.

**०३.** सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०३२४१८००११०५२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH VITHAL ROKADE

Digitally signed by SANTOSH VITHAL ROKADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=ECF4A9ABE84C70DE989C3669424C12B6CADCB583D500FE489CE8727916E0BBEE, cn=SANTOSH VITHAL ROKADE
Date: 2025.03.24 18:01:46 +05'30'

**(संतोष जया विठ्ठल रोकडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव / प्रधान सचिव / अपर मुख्य सचिव
२. मा. उपमुख्यमंत्री (वित्त आणि नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (पर्यटन), मंत्रालय, मुंबई.
८. महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
९. महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
१०. महालेखापाल, (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई.
११. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
१३. नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.
१४. वित्त विभाग (का.व्यय-१५/ अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.
१५. अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवड नस्ती, कार्यासन (पर्यटन-३)

***